**सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम (४४०६ ०४९२) लेखाशीर्षांतर्गत अनुदान वितरण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सावि-२०१८/प्र.क्र. ७४ /फ-११**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
**दिनांक : ३ नोव्हेंबर,२०१८**

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८
२) अप्पर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) म.रा. नागपूर, यांचे पत्र क्र. कक्ष-१/पी/ यो/नबाप्र/ प्र.क्र.६९/०४९२/१२६६/२०१८-१९, दि. १६.१०.२०१८
३) शासन निर्णय समक्रमांक दि. १९ मे, २०१८,
४) शासन निर्णय समक्रमांक दि. २९ मे, २०१८,
५) शासन निर्णय समक्रमांक दि. २१ जून, २०१८,
६) शासन निर्णय समक्रमांक दि. २३ ऑक्टोबर २०१८,
७) शासन निर्णय समक्रमांक दि. ३० ऑक्टोबर २०१८

**प्रस्तावना :-**

वन आणि वनेतर क्षेत्रात वृक्ष लागवड व संवर्धन करण्याकरीता राज्य योजनेंतर्गत सन २०१८-१९ करीता **"सामूहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२)"** या योजनेंतर्गत रु.६७०००.०० लक्ष इतका निधी ( **०२-मजूरी** रु. ५७०६९.२० लक्ष + **२१ पुरवठा व सामुग्री**- रु.९९३०.८० लक्ष) अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे.

२. त्यापैकी वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम राबविण्यासाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पित रक्कम रु. ३०१३५.०० लक्ष पैकी माहे एप्रिल-२०१८ ते डिसेंबर २०१८ पर्यंतच्या ९ महिन्यांच्या कालावधीकरीता वित्त विभागाच्या संदर्भिय दि.०२.०४.२०१८ च्या परिपत्रकास अनुसरुन अर्थसंकल्पित रकमेच्या ७० % म्हणजेच रु.२१०९४.५० लक्ष इतका निधी वितरित करता येऊ शकेल.

३. त्याअनुषंगाने सन २०१८-१९ करीता वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रमांतर्गत बांधील कामाकरिता (००)(०६) सामूहिक पातळीवर ठोस वनरोपन (४४०६ ०४९२) " या लेखाशिर्षाखाली आतापर्यंत संदर्भ क्र. ३,४,५, ६ व ७ येथील शासन निर्णयान्वये एकूण रु. २०६०३.८६ लक्ष निधी वितरित करण्यात आला आहे.

४. आता अप्पर प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) यांच्या संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार यवतमाळ वनवृत्तासाठी एकूण रु.४९०.१४ लक्ष इतका निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१८-१९ या वित्तीय वर्षात **(००) (०६) सामूहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२)** या योजनेंतर्गत वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम राबविण्यासाठी अर्थसंकल्पीत निधीपैकी माहे मे २०१८ ते डिसेंबर २०१८ अखेर या कालावधीकरिता यवतमाळ वनवृत्तांकरिता रु. **४९०.६४** लक्ष इतका निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

३. सदर निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदींनुसार व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

४. जिल्हानिहाय वितरीत तरतूदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाची/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्यामार्फत व्हावे.

५. प्रत्यक्षात कामास सुरुवात करण्यापूर्वी संबंधित उपवनसंरक्षक/ विभागीय वन अधिकारी यांनी वनीकरणासाठी निवडलेले क्षेत्र योग्य असल्याबाबत खातरजमा करावी.

६. प्रस्तुत प्रकरणी कार्यादेश देण्यापूर्वी तपशिलवार उपचार नकाशा तयार केला असल्याबाबत खातरजमा करावी.

७. सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून वित्त विभागाच्या संदर्भिय दिनांक ०२.०४.२०१८ रोजीच्या परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अ.क्र.८ मध्ये नमूद केलेल्या अटींच्या पूर्ततेच्या अधीन राहून खर्ची टाकण्यात यावा.

**"मागणी क्र.सी-१०,**
**४४०६ वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च,**
**(००)(०६) सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण,**
**वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम (४४०६०४९२).**

८ सदर शासन निर्णय संदर्भ क्रमांक १ येथील वित्त विभागाच्या संदर्भिय दि. २ एप्रिल २०१८ च्या परिपत्रकानुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

९ सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८११०३१५१५०७१९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chandrashekhar D Tarange

Digitally signed by Chandrashekhar D Tarange
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fb8c9383a2159ef0954b8bea7a4de7769b9a2308ecce bd89cbd1dd3f1964f665, cn=Chandrashekhar D Tarange
Date: 2018.11.03 15:21:33 +05'30'

**(चंद्रशेखर तरंगे)**
**अवर सचिव, महसूल व वन विभाग**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख),नागपूर.
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण , महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) (११ वृत्त)
५. वनसरंक्षक , सामाजिक वनीकरण ( ६ वृत्त)
६. विभागीय वन अधिकारी, सामाजिक वनीकरण ( सर्व जिल्हे)
७. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ४०० ०३२.
१०. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
११. वित्त विभाग, व्यय-१०, अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२
१२. कार्यासन अधिकारी, फ-२,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. उप सचिव/अवर सचिव (सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५. निवडनस्ती/फ-११.